**उप प्रादेशिक परिवहन कार्यालय, कल्याण या कार्यालयाचे थकित कर निर्धारण मुल्य अदा करण्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः एमव्हीडी-०५२५/प्र.क्र. १५७ /परि-४**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक

मंत्रालय, मुंबई - ३२

दिनांक : ०३ जून, २०२५

वाचा :-

परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र- काईबा (०५)/न.क्र.०३ /२०२५/का.१० (१) / जा.क्र.५०९७ दि.२५.०४.२०२५.

प्रस्तावना :-

उप प्रादेशिक परिवहन कार्यालय, कल्याण या कार्यालयाच्या नवीन इमारतीचे व जागेचे कर निर्धारण मुल्य कल्याण डोंबिवली महानगरपालिकेस अदा करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय: -**

उप प्रादेशिक परिवहन कार्यालय, कल्याण या कार्यालयाच्या नवीन इमारतीचे दि.०१.०४.२०२१ ते दि.३१.०३.२०२५ पर्यंतचे कर निर्धारण मुल्य रु.५६,६१,५६५/- (अक्षरी रुपये छपन्न लाख एकसष्ठ हजार पाचशे पासष्ट फक्त) इतकी रक्कम कल्याण डोंबिवली महानगरपालिका यांना अदा करण्यास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. यासाठी येणारा खर्च मागणी क्र. बी-३, मुख्यलेखाशिर्ष २०४१, वाहनांवरील कर, (०२) (०१) प्रादेशिक कार्यालय, दत्तमत (२०४१ ००३६), उपशिर्ष (१४ भाडेपट्टी व कर) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून त्या-त्या वित्तीय वर्षीच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला, उपविभाग -१, अनुक्रमांक ६, नियम क्र. ४० अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०६०३११४५३५६६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUNIL BABURAO APATE

Digitally signed by SUNIL BABURAO APATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=19ff433c24f38ac95f09eaa0a14f560224a1a78a80f8b940775fc013021ca5ca, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=4EA86DEC92091A126823D249DF451DF3C8D235CDD7E9111D7624C78A7C95B318, cn=SUNIL BABURAO APATE
Date: 2025.06.03 11:46:25 +05'30'

**(सु.बा.आपटे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल ( लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, १/२, मुंबई /नागपूर
२. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३. परिवहन उप आयुक्त (निरीक्षण/लेखा), परिवहन आयुक्त कार्यालय, मुंबई
४. अधिदान व लेखा अधिकारी, ठाणे
५. कक्ष अधिकारी (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
६. निवडनस्ती (परि-४)